मुंबई मोटर स्पिरीट विक्रीकर अधिनियम, १९५८ खाली डिझेलच्या खरेदी / विक्रीवर लागू होणारा कर, व्याज व शास्ती यांची वसुली माफ करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग
शासन निर्णय क्रमांक: एमएसटी-१२०४/प्र.क्र.२३/कराधान-३,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दिनांक : 2 DEC 2004

<u>प्रस्तावना</u> :

मुंबई मोटार स्पिरीट विक्रीकर अधिनियम,१९५८ खाली डिझेल, पेट्रोल इत्यादी मोटार स्पिरीटच्या विक्रीवर कर लागतो. मच्छिमार सहकारी संस्थांना त्यांनी खरेदी केलेल्या हायस्पीड डिझेल वर करमाफी देण्याचे शासनाचे धोरण आहे. या योजनेखाली पूर्वी काही संस्थामध्ये गैरव्यवहार झाल्याचे निदर्शनास आले होते. या प्रकरणांच्या निर्धारणेच्या वेळी अनेक सहकारी संस्थांवर बरेच करदायित्व आले आहे. गेली ३ वर्षे मासळीच्या अपु-या पुरवठयामुळे मच्छिमार व्यवसाय अडचणीत आला आहे व या संस्थाची आर्थिक परिस्थिती खालावली आहे. या सर्व परिस्थितीचा साकल्याने विचार करुन माननीय वित्तमंत्र्यानी सन २००४-०५ या वर्षाचा अतिरिक्त अर्थसंकल्प विधानसभेला सादर करतांना केलेल्या भाषणात "दिनांक ३० सप्टेंबर १९९७ च्या पूर्वीच्या कालावधीसाठी डिझेलच्या खरेदी विक्री संबंधात जो कर लागू झाला आहे त्याची वसुली करु नये असे "जाहिर केले . तदअनुषंगाने शासन पुढील प्रमाणे निर्णय घेत आहे.

<u>शासन निर्णय</u>

दिनांक ३० सप्टेंबर, १९९७ रोजी किंवा त्यापूर्वी संपणा-या कालावधीसाठीच्या सोबत जोडलेल्या यादीतील मच्छिमार सहकारी संस्थांनी, मुंबई मोटार स्पिरीट विक्रीकर अधिनियम १९५८ या अधिनियमाखाली, केलेल्या डिझेलच्या खरेदी - विक्रीवर या अधिनियमाखाली निर्धारणेद्वारा देय झालेला किंवा देय होईल तो कर तसेच अनुषंगीक व्याज व शास्ती यांची वसुली करु नये.

तसेच या यादीत नसलेल्या मच्छिमार सहकारी संस्थांच्या प्रकरणात उपरोक्त कालावधीसाठी गैरव्यवहार झाल्यामुळे करदायित्व निर्माण झाल्याचे दिसून आले तर त्या संस्थांना वरीलप्रमाणेच माफी देण्याचे अधिकार विक्रीकर आयुक्तांना असतील. अशा कर माफीसाठी पात्र ठरलेल्या मच्छिमार संस्थांची माहिती विक्रीकर आयुक्त शासनास देतील. मात्र एखाद्या संस्थेने अशा कर दायित्वापोटी काही रक्कम भरली असेल किंवा अपिलामध्ये काही रक्कम भरली असेल तर या कर माफीमुळे अशा रकमांचा परतावा मिळणार नाही.

२. या शासन निर्णयानुसार प्रशासकीय सहाय्य मंजूर करण्याचे अधिकार विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना देण्यात येत असून आवश्यकतेनुसार सदर अधिकार आयुक्तांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील अपर विक्रीकर आयुक्त, विक्रीकर उपायुक्त (प्रशासन), सहाय्यक विक्रीकर आयुक्त (प्रशासन) अथवा त्या दर्जाखालील इतर संबंधित अधिका-यांना हे अधिकार प्रदान करण्याची परवानगी विक्रीकर आयुक्तांना देण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(सु.ना.जामोदे)
शासनाचे उपसचिव.

प्रति,

१. विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, विक्रीकर भवन, माझगांव, मुंबई - ४०० ०१० (५० प्रती)

प्रत, माहितीसाठी व आवश्यक त्या पुढील कार्यवाहीसाठी अग्रेषित.

१. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परीक्षक, मुंबई.
६. महासंचालक, माहिती व जनसंपर्क, संचालनालय, मुंबई
७. निवड नस्ती, करधान-३.